**राज्यातील कृषि विद्यापिठांतर्गत कृषि व संलग्न यांतील पदवी अभ्यासक्रम/संलग्न महाविद्यालये खाजगी संस्थांमार्फत विना-अनुदान तत्वावर सुरु करणेबाबत.**

महाराष्ट्र शासन,

कृषी,पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग.

शासन निर्णय क्र. कृषिवि-२१९०/सीआर-२०३/२०-अे

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२

दिनांक :-१ जुलै २०००

**वाचा :-** शासन निर्णय समक्रमांक दिनांक ८ जुलै, १९९९

**प्रस्ताविक :-**

उपरोक्त दिनांक ८.७.१९९९ च्या शासन निर्णयान्वये राज्यातील ४ कृषी विद्यापीठांतर्गत कृषि व संलग्न विषयातील पदवी अभ्यासक्रम/ संलग्न महाविद्यालये खाजगी संस्थांमार्फत विना अनुदान तत्वावर सन १९९९-२००० या शैक्षणिक वर्षापासून सुरु करण्यास मान्यता दिली आहे. खाजगी संस्थांमार्फत विना अनुदान तत्वावर सुरु करावयाच्या पदवी अभ्यासक्रम/ संलग्न महाविद्यालयासाठी मान्यता देण्याबाबत मार्गदर्शक तत्त्वे/निकष निश्चित करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

राज्यातील ४ कृषि विद्यापिठांतर्गत सन २०००-२००१ या शैक्षणिक वर्षापासून सक्षम खाजगी संस्थांमार्फत विना-अनुदान तत्वावर कृषि व संलग्न विषयातील पदवी अभ्यासक्रम/ संलग्न महाविद्यालये सुरु करण्यास शासन मान्यता देत आहे. या संदर्भात शासन खालीलप्रमाणे आदेश देत आहे :-

२.१) महाराष्ट्र कृषि विद्यापीठ अधिनियम १९८३ मधील कलम ३१(११) नुसार कृषि विद्यापीठाच्या कार्यकारी परिषदेला महाविद्यालय /पदवी अभ्यासक्रम आणि पदव्युत्तरसंस्थांना संलग्नता देण्याबाबतअसलेल्या अधिकारानुसार विद्यापीठ कार्यकारी परिषद संबंधित कृषि विद्यापीठाच्या कार्यक्षेत्रातील खाजगी संस्थांकडून प्राप्त झालेले अर्ज/ प्रस्ताव विचारात घेऊन विहित मार्गदर्शक तत्त्वे/ निकषांचा अवलंब केल्यानंतर संबंधित सक्षम खाजगी संस्थेला कृषि संलग्न विषयातील पदवी अभ्यासक्रम/ महाविद्यालये विना अनुदान तत्त्वावर सुरु करण्यास

मान्यता देईल आणि अशा मान्यता प्राप्त महाविद्यालयाना संलग्न महाविद्यालयाचा दर्जा प्रदान करेल. या संदर्भात कृषि विद्यापीठे व संबंधित खाजगी संस्था /महाविद्यालये महाराष्ट्र कृषी विद्यापीठ अधिनियम १९८३, परिनियम १९९० आणि लेखा संहिता १९९१ मधील तरतुदी आणि राज्य शासन / भारतीय कृषि अनुसंधान परिषदेन भारतीय पशुवैद्यक परिषदेने वेळोवेळी विहित केलेल्या आदेश / मार्गदर्शक तत्वे आणि कार्यपध्दतींचे काटेकोरपणे पालन करतील.

(२.२) सदर महाविद्यालयांना मान्यता देताना अशा महाविद्यालयांतर्गत प्रशासकीय / शैक्षणिक कार्यांच्या दृष्टीने विहित करण्यात आलेली मार्गदर्शक तत्वे / निकष लागू राहतील.

(२.३) मान्यता प्राप्त संलग्न महाविद्यालयांमधील शिक्षणाचा दर्जा उच्चतम राखणे, संबधीत महाविद्यालयाच्या प्रशासकीय/ शैक्षणिक कार्यावर काटेकोर नियंत्रण ठेवणे,अशा महाविद्यालयामधील कार्यांचे नियतकालीक निरीक्षण/ मुल्यमापन करणे आणि त्याबाबत वेळोवेळी सुधारणा व उपाययोजना करण्यासाठी महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद कृषि विद्यापीठाच्या सल्ला समन्वयाने आवश्यक कार्यवाही करील.

(२.४) महाराष्ट्र कृषि विद्यापीठ अधिनियम १९८३ मधील कलम ३१ (१३) आणि ४० ते ४४ नुसार आवश्यकते प्रमाणे एखाद्या खाजगी संस्थेची/मान्यता प्राप्त संलग्न महाविद्यालयाचे मान्यता रद्द करण्याबाबत कृषि विद्यापठ आवश्यक कार्यवाही करील.

(२.५) कृषि व संलग्न विषयातील पदवी अभ्यासक्रम / महाविद्यालये विनाअनुदान तत्वावर सुरु करावयाची असल्यामुळे यानिमित्त संबंधित खाजगी संस्था / महाविद्यालयांना शासनामार्फत कोणतेही प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष अर्थसहाय्य / सहाय्यक अनुदान मंजूर करण्यात येणार नाही.

(२.६) वरील प्रमाणे विनाअनुदान तत्वावर महाविद्यालये कार्यान्वीत केल्यामुळे यानिमित्त येणा-या प्रशासकीय / शैक्षणिक वाढीव कार्यभाराची गरज कृषि विद्यापीठे / महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषदेने स्वत:चे उपलब्ध मनुष्यबळ आणि साधनसामुग्रीतून भागवावयाचे आहे. त्यामुळे यानिमित्त कृषि विद्यापीठे / कृषि परिषदेला शासनामार्फत कोणतेही अर्थसहाय्य / अनुदान किंवा वाढीव मनुष्यबळ / पदे मंजूर करण्यात येणार नाहीत.

३. वरीलप्रमाणे खाजगी संस्थांमार्फत विना अनुदान तत्वावर पदवी अभ्यासक्रम /संलग्न महाविद्यालये सुरु करण्याच्या संदर्भात मार्गदर्शक तत्वे आणि निकष याबाबतचा तपशील सोबतच्या **परिशिष्ट -"अ"** मध्ये नमूद केला आहे. या संदर्भात कृषि व संलग्न विषयातील निरनिराळया पदवी अभ्यासक्रमांसाठी आवश्यक असणाऱ्या बाबी आणि त्यासंबंधीची तपशीलवार मार्गदर्शक तत्वे/ निकष गरज आणि आवश्यकतेनुसार महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद वेळोवेळी विहित करेल व त्यास शासनाची मान्यता आवश्यक राहील. तसेच

उपरोक्त मार्गदर्शक तत्वे/ निकष यामध्ये सुधारणा / दुरुस्त्या करण्याच्या दृष्टीने महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद कृषी विद्यापीठाच्या सल्ला-समन्वयाने आणि शासनाच्या मान्यतेने आवश्यक कार्यवाही करेल.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने त्या विभागाच्या अनोपचारीक संदर्भ क्रमांक-३५३/२००० व्यय-१,दिनांक २८.६.२००० अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

सही/-

( रा. तु. जाधव )

अवर सचिव, महाराष्ट्र शासन,

कृषी,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व

मत्स्यव्यवसाय विभाग.

प्रति,

मा. राज्यपाल नि कुलपती. (कृषि विद्यापीठे) यांचे सचिव, राजभवन, मुंबई
मा.मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
मा. कृषीमंत्री/ मा. राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
सर्व मा.मंत्री / मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
सदस्य सचिव, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद,सर्व्हे नं.१३२/ब,भांबुर्डा, भोसले नगर,कै.कुशाबा भोसले पथ,पुणे ४११००७.
कुलगुरु / कुलसचिव / नियंत्रक, चारही कृषि विद्यापीठे
आयुक्त (कृषि) महाराष्ट्र राज्य, पुणे
आयुक्त (पशुसंवर्धन) महाराष्ट्र राज्य, पुणे
आयुक्त (मत्स्यवयवसाय) महाराष्ट्र राज्य, मुंबई
आयुक्त (दुग्ध विकास) महाराष्ट्र राज्य, मुंबई
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
महालेखापाल१/२, महाराष्ट्र राज्य, मुंबई/ नागपूर
मुख्य लेखा परिक्षण अधिकारी, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, मुंबई
सर्व मंत्रालयीन विभाग
सर्व उप सचिव/ अवर सचिव/ कार्यासन अधिकारी, कृषि व पदुम विभाग
निवड नस्ती.

200201231527100000-0400

**राज्यातील कृषि विद्यापीठांतर्गत कृषि व संलग्न विषयांतील पदवी अभ्यासक्रम / संलग्न महाविद्यालये खाजगी संस्थांमार्फत विना-अनुदान तत्वावर सुरु करण्याच्या संदर्भात मार्गदर्शक तत्वे व निकष.**

१) भारतीय कृषि अनुसंधान परिषदेच्या निकषाप्रमाणे कृषि महाविद्यालयासाठी ४० हेक्टर जमीन आवश्यक आहे. महाविद्यालय सुरु करतांना ५० टक्के जमीन संस्थेच्या मालकीची असावयास पाहिजे व उर्वरित ५० टक्के जमीन लीजवर घेतली तरी चालेल. ४० हेक्टर जमीन मालकीची असणा-या संस्थेला प्राधान्य देण्यात यावे.

२) महाविद्यालयाची प्रारंभीची प्रवेश क्षमता प्रतिवर्षी ९६ विद्यार्थी राहील.

३) भारतीय कृषि अनुसंधान परिषदेने विहित केलेल्या कर्मचारी आकृतीबंधानुसार कर्मचारी नेमण्यात यावेत. तसेच त्यांची शैक्षणिक अर्हता व अनुभव सदर परिषदेने विहित केल्यानुसार असावी. खाजगी संस्था त्यांच्याकडे उपलब्ध असलेल्या प्राध्यापक / कर्मचारी प्रमाणे परिस्थितीनुसार त्यांच्या वेतनश्रेणी कमी/जास्त करु शकतील, तसेच संस्थेमार्फत परिस्थितीनुसार व्हिजीटींग प्रोफेसर किंवा कॉन्ट्रॅक्ट पध्दतीने प्राध्यापक वर्गाच्या सेवा उपलब्ध करुन घेता येईल. प्राध्यापक संवर्गीय नेमणूका महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषदेच्या मान्यतेने कराव्यात. तसेच कर्मचा-यांच्या वेतनश्रेण्या महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषदेकडून पूर्वसम्मत करुन घ्याव्यात.

४) विना अनुदानित कृषि व संलग्न महाविद्यालयातील अभ्यासक्रम भारतीय कृषि अनुसंधान परिषद, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद आणि कृषि विद्यापीठे यांनी मान्य केलेला असावा. हा अभ्यासक्रम अद्ययावत करावयाचा असेल किंवा परिस्थितीनुसार नविन अभ्यासक्रम सुरु करावयाचा असेल तर त्यासाठी कृषि विद्यापीठ / कृषि परिषदेची मान्यता आवश्यक राहील.

५) विना अनुदानित महाविद्यालयातील अभ्यासक्रम व परिक्षा पध्दती तसेच शैक्षणिक कार्यक्रमाची गुणवत्ता टिकून राहाण्याच्या दृष्टीने महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद व कृषि विद्यापीठे दरवर्षी एक समिती नियुक्त करुन त्यामध्ये विद्यापीठाचे संचालक (शिक्षण)

आणि सहयोगी अधिष्ठाता व एक नामांकीत तज्ञ यांचा समावेश करावा. सदर समिती संबंधित संस्थेमार्फत / महाविद्यालयामार्फत विहित केलेले निकष अमलात आणण्यात येतात किंवा कसे याबाबत आढावा घेईल व संस्था / महाविद्यालयाची मान्यता कायम ठेवावी किंवा कसे याबाबत निर्णय घेईल. समितीच्या अहवालाच्या आधारे महाविद्यालयाची संलग्नता काढून टाकण्याचा पर्याय खुला ठेवावा. त्यायोगे प्रथम वर्षा व्यतिरिक्त इतर ३ वर्षातील विद्यार्थ्यांच्या हितासाठी सदर महाविद्यालय विद्यापीठाच्या ताब्यात राहील व ३ वर्षानंतर अखेरचे अनुत्तीर्ण विद्यार्थी इतरत्र सामावून घेऊन महाविद्यालयाचे अस्तित्व संपुष्टात आणावे. या संदर्भात महाराष्ट्र कृषि विद्यापीठ अधिनियम १९८३ आणि परिनियम १९९० मधील तरतुदीनुसार शासन/कृषि परिषद/कृषि विद्यापीठाने विहित केलेल्या प्रचलित आदेशानुसार / कार्यपध्दतीनुसार कार्यवाही करण्यात यावी.

६) विना अनुदानित महाविद्यालयातील विद्यार्थ्यांची परिक्षा महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषदेने स्थापन केलेल्या परिक्षा मंडळामार्फत घेण्यात येतील. याकरिता विद्यार्थीनिहाय परिक्षा शुल्क संबंधित संस्था / महाविद्यालयाला महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषदे मार्फत परिक्षा मंडळाकडे जमा करावे लागेल.

७) विना अनुदानित महाविद्यालयातील एकूण प्रवेश क्षमतेच्या १५ टक्के जागा अनिवासी भारतीय / इतर राज्यातील विद्यार्थ्यांमधून व्यवस्थापन समितीमार्फत भरण्यात येतील. १५ टक्के जागा राज्यस्तरीय गुणवत्ता यादीतून आणि ७० टक्के

..३..

जागा विद्यापीठ क्षेत्रातील विद्यार्थ्यांमधून भरण्यात येतील. यासंदर्भात महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषदेमार्फत ५ वर्षानंतर आढावा घेण्यात येईल.व्यवस्थापन कोटयातून भरावयाच्या विद्यार्थ्यांच्या बाबतीत किमान अर्हता अनिवार्य राहील.

८) विनाअनुदानीत महाविद्यालयातील ५० टक्के जागा फ्री सीट म्हणून आणि ५० टक्के जागा पेमेंट सिट म्हणून भरण्यात येतील. (व्यवस्थापनाच्या १५ % जागा सोडून) फ्री सीटसाठी रु.१५,०००/- प्रतिवर्षी प्रतिविद्यार्थी आणि पेमेंट सीटसाठी कृषि, फलोत्पादन, दुग्धव्यवसाय महाविद्यालयासाठी रु.३०,०००/- आणि जैव तंत्रज्ञान महाविद्यालयासाठी रु. ५०,०००/- प्रतिवर्षी प्रतिविद्यार्थी शैक्षणिक शुल्क आकारण्यात येईल. अनिवासी भारतीय / इतर राज्यातील विद्यार्थ्यांसाठी फ्री सीटच्या पाचपट म्हणजे रु.७५,०००/- प्रतिवर्षी प्रति विद्यार्थी शुल्क आकारावे, पशुवैद्यकीय शाखेसाठी फ्री सीट रु.२५,०००/- व पेमेंट सीटसाठी रु.५०,०००/- प्रतिवर्षी प्रतिविद्यार्थी शुल्क राहील. व्यवस्थापनाच्या कोटयातील जागेसाठी पेमेंट सीटच्या पाचपट पर्यंत शुल्क आकारण्यात यावे. वसतीगृह शुल्क व भोजनगृह इ.करिता स्थानिक परिस्थितीनुसार शुल्क आकारण्यात यावे. यानिमित्त ना नफा ना तोटा तत्वावर व्यवस्थापनाने करावयाच्या खर्चावर आधारित विद्यार्थ्यांकडून शुल्क आकारावे.

९) संबधित खाजगी संस्थाकडून हमी रक्कम / अनामत म्हणून रु. ५.०६ लाख महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषदेकडे जमा करावेत. त्यापैकी रु.२.०० लाख प्रस्ताव मंजूर झाल्यानंतर आणि रु.३.०० लाख प्रवेश प्रक्रिया पूर्ण झाल्यानंतर कृषि परिषदेकडे जमा करण्यात यावे. विनाअनुदानित कृषि व संलग्न महाविद्यालयासाठी खालीलप्रमाणे हमी रक्कम /अनामत रक्कम आकारण्यात यावी. सदर शुल्कापैकी १० % रक्कम महाराष्ट्र कृषि शिक्षण व

20020123152710000

संशोधन परिषदेकडे वर्ग करण्यात यावे. अर्जाबरोबर रु. २.०० लाख डिपॉझीट अनिवार्य ठेवण्यात यावे. त्यानंतर मंजूरी आणि प्रवेश प्रक्रिया पूर्ण झाल्यानंतर रु. ३.०० लाख घेऊन एकूण ५.०० लाखाची अनामत रक्कम ठेवली जावी.

| अ.क्र. | | रुपये लाखात |
|---|---|---|
| १ | प्रोसेसिंग फी | १.०० |
| २ | डिपॉझीट | २.५० |
| ३ | बँक गॅरंटी | २.५० |

१०) विना अनुदानीत महाविद्यालय सुरु करण्याबाबतचा प्रस्ताव मंजूर करण्याची कार्यपध्दती :- महाराष्ट्र कृषी विद्यापीठ अधिनियम १९८३ मधील कलम ३१ (११) आणि कलम ४० व ४१ मधील तरतुदीनुसार महाविद्यालय / पदवी अभ्यासक्रमांना मान्यता /संलग्नता देण्याचे अधिकार कृषि विद्यापीठाच्या कार्यकारी परिषदेला आहे. त्यामुळे प्रस्तावित विनाअनुदानित महाविद्यालये / पदवी अभ्यासक्रमांना मान्यता / संलग्नता देण्याबाबत कृषि विद्यापीठे सदर अधिनियमातील कलम ४० आणि ४१ मधील तरतुदीनुसार उचित कार्यवाही करतील. या संदर्भात संबधित इच्छुक संस्थेने विहित प्रस्ताव संबधित कृषि विद्यापीठाकडे सादर करावा. सदर प्रस्तावाची विद्यापीठांतर्गत समितीमार्फत छाननी करण्यात येवून वर नमूद केलेल्या कायदेशीर तरतुदीनुसार प्रस्तावाला मान्यता देण्याबाबत कृषि विद्यापीठ उचित कार्यवाही करील. यासंदर्भात काही तक्रारी / समस्या उपस्थित झाल्यास त्याबाबत महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद महाराष्ट्र कृषि विद्यापीठ अधिनियम १९८३ मधील तरतुदीनुसार याप्रकरणी पडताळणी करुन अंतिम निर्णय घेईल.

200201231527100000-0400

११) विनाअनुदानीत महाविद्यालयांतर्गत पदे/मनुष्यबळ, पाणी पुरवठा, दळणवळण , इमारती, प्रयोगशाळा उपकरणे, यंत्रसामुग्री, शेती औजारे, वाहने, ग्रंथालये, अनुषंगीक सोयी सुविधा, इत्यादी बाबत महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद / कृषि विद्यापीठांच्या सल्ला समन्वयाने सविस्तर मार्गदर्शक तत्वे / निकष निश्चित करील. किमान २५ टक्के सुविधा उभारल्याशिवाय प्रवेश प्रक्रियेस अनुमती देऊ नये.

१२) प्रत्येक कृषी विद्यापीठांतर्गत कृषि व संलग्न विषयातील विना अनुदानीत महाविद्यालयाची संख्या खालीलप्रमाणे राहील. या संदर्भात योग्य वेळी आढावा घेऊन महाविद्यालयाच्या संख्येत बदल करण्याबाबत विचार करण्याबाबत विचार करण्यात यावा.

| अ.क्र. | विषय | महाविद्यालयांची संख्या |
|---|---|---|
| १ | कृषी/कृषी तंत्रज्ञान | २ |
| २ | फलोत्पादन | १ |
| ३ | पशुवैद्यक | १ |
| ४ | दुग्धतंत्र | १(डॉ.पं.दे.कृ.वि.वगळून) |
| ५ | अन्नतंत्र | १( म.कृ.वि.वगळून) |
| ६ | कृषी,पणन आणि व्यवसाय व्यवस्थापन | १ |
| ७ | मत्स्य | १(को.कृ.वि.सोडून) |
| ८ | कृषि अभियांत्रिकी | १ |
| ९ | जैवतंत्रज्ञान | १ |
| १० | वनशास्त्र | १ |